राखीव वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सिमांकन योजनेंतर्गत सन २०२३-२४ करिता निधी वितरीत करण्याबाबत.. (४४०६-००५३).

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०२३/प्र.क्र.१७४/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २४ ऑगस्ट, २०२३.

**वाचा :-**

१. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२.०४.२०२३.
२. प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.- कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.१५/५१/२०२३-२४, दिनांक २५.०४.२०२३.
३. प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.१५/१९८/२०२३-२४, दिनांक १३.०६.२०२३.
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक ६.०७.२०२३.
५. प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.- कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.१५/३२५/२०२३-२४, दिनांक २७.०७.२०२३.

**प्रस्तावना :-**

"राखीव वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सीमांकन" (**४४०६ ००५३**) या राज्य योजनेअंतर्गत सन २०२३-२४ साठी एकूण रु. **८०००.००** लक्ष (०२- मजूरी रु. १३६०.०० लक्ष, २७ - लहान बांधकामे रु. ३६८०.०० लक्ष व ५३- मोठी बांधकाम रु. २९६०.०० लक्ष) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १ च्या परिपत्रकान्वये एप्रिल ते जून २०२३ या पहिल्या तिमाहीसाठी २०%, जुलै ते सप्टेंबर २०२३ या तिमाहीसाठी २०% व ऑक्टोबर ते डिसेंबर २०२३ या तिमाहीसाठी ३०% च्या मयादेत निधी वितरीत करण्यास मान्यता दर्शविलेली आहे.

प्रस्तुत योजनेअंतर्गत पुणे, औरंगाबाद, गडचिरोली, कोल्हापूर, धुळे, ठाणे व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) प. मुंबई वनवृत्तासाठी आवश्यक एकूण रु. ६७५.३५ लक्ष निधी वितरीत करण्याबाबचा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र. २, ३ व ५ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे. मागणी केलेल्या एकूण रक्कम रु. ६७५.३५ लक्ष निधीपैकी एकूण रक्कम रु. ३५५.१७ लक्ष निधी या विभागाच्या दिनांक ६.०७.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला असून एकूण रु. ३२०.१८ लक्ष निधी वितरीत करणे शिल्लक आहे.

३. आता, या योजनेअंतर्गत सन २०२३-२४ करिता अर्थसंकल्पित असलेल्या रु. ८०००.०० लक्ष निधीपैकी वित्त विभागाच्या अर्थसंकल्पिय प्रणालीप्रमाणे माहे जुलै-२०२३ अखेर एकूण रु. २१०४.०० लक्ष (०२ मजूरी- रु. ४०८.०० लक्ष, २७-लहान बांधकामे- रु. ११०४.०० लक्ष व ५३ मोठे बांधकामे -रु. ५९२.००लक्ष) निधी उपलब्ध आहे. सदर निधीतून मागणी केलेला उर्वरित रु. ३२०.१८ लक्ष निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

सन २०२३-२४ करिता "राखीव वनाचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन" (**४४०६ ००५३**) या योजनेअंतर्गत ठाणे वनवृत्तासाठी रु. ३२०.१८ लक्ष (०२ मजूरी- ५४.४३ लक्ष, २७ लहान कामे - १४७.२८ लक्ष, ५३ मोठी कामे - रु. ११८.४७ लक्ष) निधी खालील अटींच्या अधीन राहून खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत आहे :-

१) ज्या प्रयोजनासाठी खर्चास मंजूरी देण्यात आली आहे, त्याच प्रयोजनावर निधी खर्च करण्यात यावा

२) या मध्ये कोणत्याही प्रकारची वित्तिय अनियमितता होणार नाही, याची पुरेपूर दक्षता घेण्यात यावी.

३) वित्त विभागाने दि. ११/७/२००१ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या वित्तिय मर्यादा यापुढेही लागू राहतील.

४) सदर मान्यता ही आर्थिक वर्ष २०२३-२४ या कालावधी करिताच देण्यात येत आहे.

५) सदर बांधकाम करताना वन (संवर्धन) अधिनियम, १९८० चा भंग होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

६) खर्चाच्या अनुषंगाने उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

७) आर्थिक वर्षाअखेर वितरीत निधी आर्णि अखर्चित निधीची पडताळणी करण्यात अखर्चित निधी तातडीने शासनखाती जमा करण्यात यावा.

८) निधी वितरीत करताना प्रस्तुत कामे दुबार होत नसल्याची खातरजमा करावी.

**२.** सदर खर्च हा मागणी क्रमांक- सी-१०, ४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च राज्य योजनांतर्गत योजना वनाचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन (४४०६-००५३) या शीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०२३-२४ मध्ये मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. निधी खर्च करताना वित्त विभागाने मासिक निधी विवरणपत्र तसेच इतर बाबतीत दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

**३.** सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३ च्या मान्यतेने तसेच शासन निर्णय क्रमांक वि.अ.प्र.-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम /भाग-२, दिनांक १७/४/२०१५ भाग पहिला उप विभाग-३ परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८२५११००१०४६१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APARNA SUHAS UPASANI

Digitally signed by APARNA SUHAS UPASANI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=130a2ee40839d75ff18e93244499097828091ef8e09f856d6e8f0c403254f40a, pseudonym=3697F9C1859177438542B4E103592744309AD950, serialNumber=00DDF81FCF3DFD3E814E1C6D5D5D1249D28D65601EB04ECDFF837C158CB2ED4C, cn=APARNA SUHAS UPASANI
Date: 2023.08.25 11:03:42 +05'30'

**( अपर्णा उपासनी )**
**कार्यासन अधिकारी**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.

४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), ठाणे
६) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.
७) उप वनसंरक्षक (प्रा.), रोहा.
८) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
९) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१०) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसं-६ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
११) कार्यासन अधिकारी (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३) निवडनस्ती, कार्यासन (फ-३), म.व.व.वि., मंत्रालय, मुंबई-३२.